**सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक - राजस-१५१०/प्र.क्र.४४६/५-स**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - २६ ऑगस्ट, २०११**

**वाचा -**

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. राजस-१७०८/प्र.क्र.४८९/५-स, दि.१८.३.२०१०
२. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक - एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/ का-तीन,दि. २२.१०.२०१०
३. शासन निर्णय विधी व न्याय विभाग क्र.एचटीसी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दि.५.१.२०११
४. प्रबंधक (तपासणी-२) मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.ए/एसपीएल. सेल/जनरल/६७१/२०११, दि.२५.१.२०११
५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.मरासअन्या/आस्था/पद्मनाभन/२५२/२०११, दि. ३.३.२०११

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालयातील सदस्यांना, शासन निर्णय, दि.१८/३/२०१० अन्वये दि.१/१/२००६ पासून न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आल्या आहेत.

मा.सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.क्र.१०२२/८९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार नेमलेल्या न्यायमूर्ती पद्मनाभन यांच्या अध्यक्षतेखालील समितीने (दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग) जुलै, २००९ मध्ये अहवाल दिला असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर आयोगाच्या शिफारशी दुय्यम न्यायिक अधिका-यांना लागू करण्याचे निर्देश सर्व राज्य शासनांना दिले आहेत. त्यानुसार विधी व न्याय विभागाने दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या असून अन्य मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिका-यांसाठी होणा-या खर्चाची तरतूद स्वतंत्ररित्या करावी असे शासन निर्णयामध्ये नमूद केले आहे. तसेच, प्रबंधक (तपासणी-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी दि.२५.१.२०११ च्या पत्रान्वये, मा.उच्च न्यायालयाच्या दि.११.११.२०१० च्या अधिसूचनेनुसार, न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना लागू करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याविषयी विनंती केली आहे.

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांनी दि.३.३.२०११ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना न्या.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर बाब शासनाच्या विचाराधिन होती. सबब, याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दि. ४.५.२०१० व दि. २.८.२०१० च्या न्यायनिर्णयानुसार तसेच विधी व न्याय विभागाच्या दि.२२.१०.२०१० च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने, न्या. पद्मनाभन समितीने शिफारस केल्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून उच्च वेतनश्रेणी व विवक्षित भत्ते आणि सुविधा देण्यास महाराष्ट्र शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

२. न्या. पद्मनाभन समितीने शिफारस केल्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांची सुधारीत वेतनश्रेणी पुढीलप्रमाणे राहील :-

| पदनाम | सुधारीत वेतनश्रेणी |
|---|---|
| सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय | रु.५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० |

३. महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना, विधी व न्याय विभागाच्या दि.२२.१०.२०१० च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे विवक्षित भत्ते व सुविधा अनुज्ञेय राहतील.

४. कार्यरत असलेले जे सदस्य वेतन व महागाई भत्त्याची थकबाकी मिळण्यास पात्र असतील, त्यांना देय होणारी थकबाकीची ६०% रक्कम रोखीने देण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी तसेच रोखीने द्यावयाच्या व भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावयाच्या अशा दोन्ही रकमांपैकी अर्धी रक्कम चालू आर्थिक वर्षात व अर्धी रक्कम पुढील आर्थिक वर्षात अदा/जमा करण्यात यावी. दिनांक १.५.२०१० पासून वेतन व महागाई भत्त्याची रक्कम रोखीने देण्यात यावी.

तसेच कार्यरत सदस्यांना वेतनेतर भत्त्याच्या थकबाकीच्या रकमेपैकी ६०% रक्कम तीन महिन्यात रोखीने देण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम त्यानंतर ९ महिन्यात रोखीने म्हणजेच चालू व पुढील अशा दोन आर्थिक वर्षात देण्यात यावी.

५. दिनांक १.१.२००६ रोजी अथवा तद्नंतर सेवानिवृत्त झालेल्या सदस्यांना थकबाकीची रक्कम देण्याबाबत विधी व न्याय विभागाच्या दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून संबंधितांनी एक महिन्याच्या आत लेखी स्वरुपात विकल्प भरुन द्यावेत.

७. यासाठी हाणारा खर्च त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर वित्तीय अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, विधी व न्याय विभागाने, क्रमांक-१२५२, दि. १२.५.२०११ अन्वये तसेच वित्त विभागाने, अनौ.सं.क्र.२६६/सेवा-९, दि.९.८.२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु.गं.गांगरकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने)
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई
सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई/पुणे/नागपूर,औरंगाबाद
सर्व सहकारी न्यायालये, द्वारा-प्रबंधक महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालये, मुंबई
सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन),
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, (लेखापरीक्षा व लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, औरंगाबाद
वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (व्यय/वित्त विभाग), मंत्रालय
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (१७-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय , मुंबई
निवड नस्ती.

विषय :-**सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांच्या वेतन निश्चितीबाबत . .**
न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करणे.

प्रस्तुत नस्तीमधील टिप्पणी विभागाचे कृपया अवलोकन व्हावे.

२. महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालयाच्या सदस्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव सदर नस्तीवर विचाराधिन आहे.

३. विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिकाऱ्यांना न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू केल्या असून न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन निश्चिती करण्याबाबत श्री.जे.व्ही.व्यवहारे, सेवानिवृत्त सदस्य व श्रीमती एस.आर.पवार, सदस्या, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांनी दि.३०/१०/२०१० च्या अर्जान्वये विनंती केली आहे. निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५/१/२०११ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांच्याकडून अभिप्राय मागविण्यात आले असता त्यांनी दि.३/३/२०११ च्या पत्रान्वये याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

४. श्री.व्यवहारे यांनी त्यांच्या अर्जामध्ये असे नमूद केले आहे की, त्यांनी मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.३३८/२०१० मध्ये मा.न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार दि.१८/३/२०१० च्या शासन निर्णयान्वये मा.शेट्टी आयोगाच्या शिफारशी महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालयाच्या सदस्यांना दि.१/१/२००६ पासून लागू करण्यात आल्या आहेत. सदर शिफारशी लागू करण्याच्या दिनांकामध्ये दुरुस्ती करण्यासंदर्भात त्यांनी शासनाकडे निवेदन सादर केले आहे.

दरम्यान मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.क्र. १०२२/८९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार नेमलेल्या न्यायमूर्ती पद्मनाभन यांच्या अध्यक्षतेखालील समितीने (दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग) जुलै, २००९ मध्ये अहवाल दिला असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर आयोगाच्या शिफारशी दुय्यम न्यायिक अधिका-यांना लागू करण्याचे निर्देश सर्व राज्य शासनांना दिले आहेत. त्यानुसार विधी व न्याय विभागाने दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या असून अन्य मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिका-यांसाठी होणा-या खर्चाची तरतूद स्वतंत्ररित्या करावी असे देखील शासन निर्णयामध्ये नमूद केले आहे. त्यानुसार सहकार विभागाने देखील आदेश निर्गमित करणे आवश्यक आहे. सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय या पदाची न्या. शेट्टी आयोगानुसार निश्चित केलेली वेतनश्रेणी रु.१६७५०-४००-१९१५०-४५०-२०५०० अशी आहे. न्या.पद्मनाभन समितीनुसार सदर पदाची वेतनश्रेणी रु.५१५५०-१२३०-५८९३० -१३८०-६३०७० अशी सुधारीत करणे आवश्यक आहे. यापूर्वी मा.उच्च न्यायालयाने दि.५/२/२००८ च्या पत्रान्वये सहकार न्यायालये व सहकार अपील न्यायालये ही मा.उच्च न्यायालयाच्या नियंत्रण व पर्यवेक्षणाखाली असून त्यांचा समावेश दुय्यम न्यायिक सेवेमध्ये होत असल्याचे स्पष्ट केले आहे. श्री.व्यवहारे यांनी असेही नमूद केले आहे की, ते दि.२/४/२०१० पासून सेवानिवृत्त झाले असून त्यांना दि.१/२/०८ पासून सुधारीत वेतनश्रेणी देय आहे. तसेच श्रीमती पवार यांना सदस्य म्हणून नियुक्तीच्या दिनांकापासून सुधारित वेतनश्रेणी देय आहे. तरी सदस्य सहकार अपील न्यायालय यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याची विनंती श्री. व्यवहारे यांनी केली आहे.

५. प्रबंधक (तपासणी-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी दिनांक २५.१.२०११ च्या पत्रान्वये उच्च न्यायालयाच्या दिनांक ११.११.२०१० च्या अधिसूचनेची प्रत शासनास पाठविली असून न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी सहकारी अपील

न्यायालयाच्या सदस्यांना लागू करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती केली आहे.

६. श्री.व्यवहारे यांच्या निवेदनाच्या अनुषंगाने दि.२४/११/२०१० च्या शासन पत्रान्वये अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांचे अभिप्राय मागविण्यात आले. त्यानुसार दि.३/३/२०११ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. प्रस्तावात असे नमूद करण्यात आले आहे की, विधी व न्याय विभागाच्या दि.२२/१०/२०१० व ५/१/२०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील दुय्यम न्यायालयातील कार्यरत व निवृत्त न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे. सहकार अपील न्यायालयाच्या सदस्यांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आल्या असल्याने त्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी सुध्दा लागू करणे आवश्यक असल्याचे मत अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांनी व्यक्त केले आहे.

७. महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालयाचे एकूण चार सदस्य असून त्यापैकी २ सदस्य सहकार न्यायाधीशातून पदोन्नतीने व २ सदस्य जिल्हा न्यायाधिशातून नामनिर्देशनाद्वारे भरण्यात येतात. सहकारी अपील न्यायालयातील कार्यरत सदस्यांच्या सदस्य पदावरील नियुक्तीचे दिनांक तसेच राज्य शासनाच्या सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याचा दिनांक विचारात घेऊन सदस्यांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१/१/२००६ पासून लागू करण्यात आल्या. तथापि, काही निवृत्त सदस्यांनी विधी व न्याय विभागाच्या दि. ४.७.२००३ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार दिनांक १.७.१९९६ पासून तर श्री. व्यवहारे यांनी दिनांक ४.७.२००३ पासून शिफारशी लागू करण्याची विनंती केली आहे. यासंदर्भात असे नमूद करण्यात येते की, मा. उच्च न्यायालयाने शेट्टी आयोगाच्या शिफारशी न्यायिक अधिकाऱ्यांना लागू करण्याबाबत दिनांक २९.७.२००३ रोजी जारी केलेल्या अधिसूचनेमध्ये सहकारी न्यायालये/अपील न्यायालये यांच्याबाबत विशिष्ट उल्लेख नसल्याने सदर अधिसूचनेमध्ये योग्य ती सुधारणा

करण्याची विनंती दिनांक २५.६.२०१० च्या पत्रान्वये मा. उच्च न्यायालयास करण्यात आली होती.

प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही, वेतन भत्ते व वित्तलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली आहे तसेच न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे.

८. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि. १.९.१९९८ पासून सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना शेट्टी आयोगाच्या शिफारशी तसेच दिनांक १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करणे योग्य राहील, असे प्रस्तावित करण्यात आले होते.

९. **सदर प्रकरणी विधी व न्याय विभागाने त्यांच्या पृ. ९-११/टि.वि. वरील टिप्पणीअन्वये मान्यता दिली आहे. त्यानंतर वित्त विभागाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यात आला.**

१०. **सदर प्रकरणी वित्त विभागाने दिलेले अभिप्राय कृपया पृ.१५-१६/टि.वि. वर पहावेत. वित्त विभागाने, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दिनांक १/९/१९९८ पासून न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावावर भाष्य करता येत नसल्याचे नमूद केले असून, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.**

११. यापूर्वी दिनांक १८.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये सदस्यांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१.१.२००६ पासून लागू करण्यात आल्या होत्या. तथापि, न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीही दि.१.१.२००६ पासून लागू करावयाच्या असल्याने न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी पूर्वलक्षी प्रभावाने लागू करणे आवश्यक आहे. त्यानुसार न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१.९.१९९८ पासून लागू करण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. तथापि, वित्त विभागाने, न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१.९.१९९८ पासून लागू करण्यासंदर्भात दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने याबाबत स्वतंत्र नस्तीद्वारे कार्यवाही करण्यात यावी. तत्पूर्वी, **या विषयावर मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. २२४/२०११ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याचे आदेश दिले असल्याने, वित्त विभागाने मान्यता दिल्याप्रमाणे, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्यास मान्यता देण्याबाबतची कार्यवाही प्रथमत: करण्यात यावी.**

१२. न्या.पद्मनाभन समितीनुसार सदस्य पदाची वेतनश्रेणी रु.५१५५०-१२३०-५८९३० -१३८०-६३०७० असून सदस्यांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

अतिथी भत्ता- वरीष्ठ स्तर- रु.२३००/-
वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-

| | | |
|---|---|---|
| वैद्यकीय भत्ता | - | रु.१०००/- |
| पेपर भत्ता | - | रु. २५०/- |
| पोषाख भता | - | रु. ६०००/- (३ वर्षातून एकदा) |
| पेट्रोल | - | ७५ लिटर |
| दूरध्वनी | - | दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स: कार्यालय- १५०० निवासस्थान-७५० |

१३. महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयातील सदस्यांना न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू केल्यास, रु.१९,२३,२२९/- इतका वार्षिक आर्थिक भार अपेक्षित असून थकबाकीपोटी रु.४३,२०,१००/- इतका आर्थिक भार येईल.

१४.	सबब, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्यास विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभगाने दिलेली मान्यता लक्षात घेऊन सदर प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती मा. मंत्री (सहकार) यांना करण्यात येत आहे.

सदर प्रस्तावास शासनाची मान्यता मिळाल्यास पृ.      /प.वि. येथे सादर करण्यात आलेल्या प्रारुपाप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

१५.	**श्री. व्यवहारे यांनी न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय मुंबईच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये रिट याचिका क्र.२२४/२०११ दाखल केली आहे. सदर रिट याचिकेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याबाबत आदेशित केले आहे. त्यामुळे या प्रकरणी दि.२६/८/२०११ पूर्वी निर्णय घेण्याची आवश्यकता असल्याने यास प्राथम्य देण्याची विनंती करण्यात येत आहे.**

**क.अ. (श्री.गां.)**

**उ.स.(श्रीम.पा.)**

**सचिव (सहकार)**

**मा. मंत्री (सहकार)**

**सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक - राजस-१५११/प्र.क्र.२०३/५-स**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - २६ ऑगस्ट, २०११**

**वाचा -**

१) शासन अधिसूचना, क्र.एमसीटी १०९०/८७१६/प्र.क्र.१५४/५-स, दि.३१.८.१९९८

२) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक - एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/ का-तीन, दि. २२.१०.२०१०

३) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक - एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दि.५.१.२०११

४) प्रबंधक (तपासणी-१) मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.ए/ एसपीएल. सेल/ जनरल/ ३७३०/२०११, दि.१०.५.२०११

५) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र जाक्र. मरासअन्या/ आस्था/पद्मनाभन/२५२/२०११, दि. ३.३.२०११

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.क्र. १०२२/८९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार नेमलेल्या न्यायमूर्ती पद्मनाभन यांच्या अध्यक्षतेखालील समितीने (दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग) जुलै, २००९ मध्ये अहवाल दिला असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर आयोगाच्या शिफारशी दुय्यम न्यायिक अधिका-यांना लागू करण्याचे निर्देश सर्व राज्य शासनांना दिले आहेत. त्यानुसार विधी व न्याय विभागाने दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या असून अन्य मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिका-यांसाठी होणा-या खर्चाची तरतूद स्वतंत्ररित्या करावी असे शासन निर्णयामध्ये नमूद केले आहे.

तसेच, प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये, सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही वेतन, भत्ते व परिलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली असून न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना न्या.शेट्टी आयोग व न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे.

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांनी त्यांच्या दि.३.३.२०११ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी न्यायालयातील न्यायाधिशांना न्या. शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करण्यास तसेच न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार त्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.४/५/२०१० व दि.२/८/२०१० च्या न्यायनिर्णयानुसार आणि विधी व न्याय विभागाच्या दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने, तसेच प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रास अनुसरुन सहकार न्यायालयाच्या न्यायाधिशपदी सरळसेवेने नियुक्त झालेल्या न्यायाधिशांना दिनांक १/९/१९९८ पासून न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशीनुसार तसेच दिनांक दि. १/१/२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार उच्च वेतनश्रेणी, विवक्षित भत्ते व सुविधा लागू करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

२. सहकार न्यायाधिशांची सुधारीत वेतनश्रेणी पुढीलप्रमाणे राहील :-

| न्या. शेट्टी आयोगानुसार सुधारीत वेतनश्रेणी (दि.१/९/१९९८ पासून लागू) | न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी (दि.१/१/२००६ पासून लागू) |
|---|---|
| रु.९०००-२५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० | रु.२७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० |

३. सहकार न्यायाधिशांना विधी व न्याय विभागाच्या दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे विवक्षित भत्ते व सुविधा अनुज्ञेय राहतील.

४. कार्यरत असलेले जे न्यायाधिश वेतन व महागाई भत्त्याची थकबाकी मिळण्यास पात्र असतील, त्यांना देय होणारी थकबाकीची ६०% रक्कम रोखीने देण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी तसेच रोखीने द्यावयाच्या व भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावयाच्या अशा दोन्ही रकमांपैकी अर्धी रक्कम चालू आर्थिक वर्षात व अर्धी रक्कम पुढील आर्थिक वर्षात अदा/जमा करण्यात यावी. दिनांक १.५.२०१० पासून वेतन व महागाई भत्त्याची रक्कम रोखीने देण्यात यावी.

तसेच कार्यरत न्यायाधिशांना वेतनेतर भत्त्याच्या थकबाकीच्या रकमेपैकी ६०% रक्कम तीन महिन्यात रोखीने देण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम त्यानंतर ९ महिन्यात रोखीने म्हणजेच चालू व पुढील अशा दोन आर्थिक वर्षात देण्यात यावी.

५. दिनांक १.१.२००६ रोजी अथवा तद्नंतर सेवानिवृत्त झालेल्या न्यायाधिशांना थकबाकीची रक्कम देण्याबाबत विधी व न्याय विभागाच्या दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून संबंधितांनी एक महिन्याच्या आत लेखी स्वरुपात विकल्प भरुन द्यावेत.

७. यासाठी होणारा खर्च त्या त्या वर्षाच्या मंजूर वित्तीय अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, विधी व न्याय विभागाने, क्रमांक-१७५७, दि. १६/७/२०११ अन्वये तसेच वित्त विभागाने, अनौ.सं.क्र.३४३/सेवा-९, दि.१०.८.२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु.गं.गांगरकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने)
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई
सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई/पुणे/नागपूर,औरंगाबाद
सर्व सहकारी न्यायालये, द्वारा-प्रबंधक महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालये, मुंबई
सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन),
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, (लेखापरीक्षा व लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, सातारा, ठाणे, नाशिक, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर, सांगली, रायगड, जळगांव, नांदेड, लातूर, अमरावती.
वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (व्यय/वित्त विभाग), मंत्रालय
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (१७-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय , मुंबई
निवड नस्ती.

विषय -**सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबत**

प्रस्तुत नस्तीमधील टिप्पणी विभागाचे कृपया अवलोकन व्हावे.

२. सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार तसेच न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याविषयीचा प्रस्ताव प्रस्तुत नस्तीवर विचाराधिन आहे.

३. मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी. क्रमांक १०२२/१९८९ मध्ये दिलेल्या निदेशानुसार नेमलेल्या मा.न्यायमूर्ती, श्री.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत सर्व राज्य शासनांना दिलेल्या निर्देशास अनुसरून विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१०, दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील कार्यरत तसेच सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतन व भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. तसेच इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतूद स्वतंत्रपणे करण्याबाबत नमूद केले आहे.

४. त्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई व खंडपीठातील सदस्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिली असून त्यानुसार पुढील कार्यवाही स्वतंत्र नस्तीवर करण्यात येत आहे.

५. सहकार विभागाच्या अखत्यारीत सध्या २३ सहकारी न्यायालये कार्यरत असून त्यापैकी १६ ठिकाणी विभागाने सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिश कार्यरत असून उर्वरित ठिकाणी न्यायिक सेवेतील न्यायाधिशांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. सहकार विभागाच्या न्यायाधिशांना अद्याप न्या. शेट्टी तसेच न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्यात आलेल्या नाहीत.

प्रबंधक (तपासणी-१), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि.१९/४/२०१० च्या पत्रान्वये शेट्टी आयोगाच्या शिफारशी सहकार न्यायाधिशांनाही लागू करण्याची विनंती केली होती. तथापि, उच्च न्यायालयाच्या दि.२९/७/२००३ च्या अधिसूचनेत सहकार न्यायाधिशांना शिफारशी

लागू करण्यासंदर्भात सुधारणा करण्याची विनंती मा.उच्च न्यायालयाला दि.३/६/२०१० च्या शासन पत्रान्वये करण्यात आली होती. त्यानुसार प्रबंधक (तपासणी-१) यांनी दि.१०.५.२०११ च्या पत्रान्वये, सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही वेतन, भत्ते व परिलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली असून न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे. सदर बाब तसेच वर नमूद केल्याप्रमाणे विधी व न्याय विभागाच्या दि.२२.१०.२०१० च्या शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेता सहकार न्यायालयाच्या न्यायाधिशांना न्या.शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करणे आवश्यक आहे.

त्यानुसार सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करावी लागेल. विधी व न्याय विभाग शासन निर्णय, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि.१.९.१९९८ पासून सहकार न्यायाधिश संवर्गाला शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.

६. सहकार न्यायाधिशांची ५ व्या वेतन आयोगानुसारची वेतनश्रेणी रु.८०००-१३५००/- अशी असून ६ व्या वेतन आयोगानुसारची वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००, ग्रेड पे-५४०० अशी आहे.

मा.उच्च न्यायालयाने सहकार न्यायाधिशांना, दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) यांची वेतनश्रेणी लागू केली असून न्या.शेट्टी आयोगानुसार सहकार न्यायाधिशांची सुधारीत वेतनश्रेणी - रु.९०००- २५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० असून मा. न्या.पद्मनाभन समितीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी- २७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० अशी होईल.

तसेच न्या.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार,सहकार न्यायाधिशांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

१. अतिथी भत्ता - कनिष्ठ स्तर- रु.१५००/-
२. वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-
३. वैद्यकीय भत्ता - रु.१०००/-
४. पेपर भत्ता - रु. २५०/-
५. पोषाख भता - रु. ५०००/- (३ वर्षातून एकदा)
६. पेट्रोल - ७५ लिटर
७. दूरध्वनी - दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स- - कार्यालय- १५०० निवासस्थान-७५०

७. उपरोक्त बाबी लक्षात घेऊन, मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव पृ.१-४/टि.वि.अन्वये विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभाग यांना सादर करण्यात आला होता.

८. **सदर प्रस्तावास अनुसरून विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय कृपया पृ. ५/टि.वि. वर पहावेत.** सदर प्रकरणी, मा.उच्च न्यायालयाकडून याबाबत दि. १०.५.२०११ रोजी लिहिलेल्या पत्रानुसार स्पष्टपणे अभिप्राय कळविण्यात आलेले आहेत. त्यानुसार विभागामार्फत कारवाई अपेक्षित आहे, असे अभिप्राय विधी व न्याय विभागाने दिलेले आहेत.

९. **सदर प्रकरणी वित्त विभागाने दिलेले अभिप्राय कृपया पृ.१३-१५/टि.वि. वर पहावेत.**

सरळसेवेने, सहकारी न्यायालयाच्या न्यायाधिश पदी नियुक्त होणाऱ्या न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि. १/९/१९९८ पासून व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी दि. १/१/२००६ पासून लागू करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिली असून त्यामूळे शासनास येणाऱ्या वार्षिक आर्थिक भाराचा स्पष्टपणे उल्लेख करुन सदर प्रस्तावास शासनाची मान्यता घेण्याबाबत कळविले आहे.

१०. सदर प्रस्तावापोटी शासनास रु.१,१२,३०,३४४/- इतका वार्षिक आर्थिक भार अपेक्षित असून थकबाकीपोटी रु.२,२७,९२,१९०/- इतका आर्थिक भार येईल. सदर

प्रकरणी विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभागाने दिलेली मान्यता लक्षात घेऊन, मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार त्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मान्यता देण्याची विनंती मा.मंत्री (सहकार) यांना करण्यात येत आहे.

**११. याप्रकरणी असे नमूद करण्यात येते की, श्री.मखरे, तत्कालिन सहकार न्यायाधिश यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. ४२३/२०११ दाखल केली असून त्यानुषंगाने दि. ९.८.२०११ रोजी झालेल्या सुनावणीदरम्यान सदर प्रकरणी ४ आठवडयांच्या आत निर्णय घेण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिले आहेत. त्यामुळे या प्रकरणी दि.८/९/२०११ पूर्वी निर्णय घेणे आवश्यक आहे.**

सदर प्रस्तावास शासनाची मान्यता मिळाल्यास पृ.    /प.वि. वरील प्रारुपाप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

**क.अ. (श्री.गां.)**

**उ.स.(श्रीम.पा.)**

**सचिव (सहकार)**

**मा. मंत्री (सहकार)**

**स.प. व व.वि/५-स**

विषय - **सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबत**

उपरोक्त विषयावरील पृ. १-४/टि.वि. वरील टिप्पणीचे कृपया अवलोकन करावे.

मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार त्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याची विनंती सदर टिप्पणीन्वये विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभाग यांना करण्यात आली होती.

**उक्त विषयी सादर करण्यात आलेला प्रस्ताव खालीलप्रमाणे -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी. क्रमांक १०२२/१९८९ मध्ये दिलेल्या निदेशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती, श्री. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत सर्व राज्य शासनांना दिलेल्या निर्देशास अनुसरून विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१०, दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील कार्यरत तसेच सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतन व भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. तसेच इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद स्वतंत्रपणे करण्याबाबत नमूद केले आहे.

त्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई व खंडपीठातील सदस्यांना मा. न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिली असून त्यानुसार पुढील कार्यवाही स्वतंत्र नस्तीवर करण्यात येत आहे.

प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही वेतन, भत्ते व परिलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली आहे तसेच न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे. सदर बाब तसेच वर नमूद केल्याप्रमाणे विधी व न्याय विभागाच्या दि. २२.१०.२०१० च्या शासन निर्णयातल तरतुदी विचारात घेता सहकार न्यायालयाच्या न्यायाधिशांना न्या. शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करणे आवश्यक आहे. सहकार न्यायालयावर १६ न्यायाधिश सहकार विभागाचे असून त्यांना ६ व्या वेतन

आयोगाप्रमाणे वेतन देण्यात येते. त्यानुसार सहकार न्यायालयातील १६ न्यायाधिशांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करावी लागेल. विधी व न्याय विभाग शासन निर्णय, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि. १.९.१९९८ पासून सहकार न्यायाधिश संवर्गाला शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करणे उचित होईल.

मा. उच्च न्यायालयाने सहकार न्यायाधिशांना, दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) यांची वेतनश्रेणी लागू केली असून न्या.शेट्टी आयोगानुसार सहकार न्यायाधिशांची वेतनश्रेणी - रु. ९०००- २५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० असून मा. न्या.पद्मनाभन समितीप्रमाणे वेतनश्रेणी- २७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० आहे.

शेट्टी आयोगाच्या शिफारशीनुसार, सहकार न्यायालयातील न्यायाधिशांचे वेतन कमी येत असल्याने दि.१.९.१९९८ ते ३१.१२.२००५ या कालावधीतील वेतनापोटीच्या रकमेत फरक येत नाही. तथापि भत्त्यापोटी द्यावयाच्या फरकाची पृ.३३/प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रक्कम रुपये १०,८०,९१८/- इतकी आहे.

मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार, दि. १.१.२००६ ते दि. ३१.१.२००८ या कालावधीत कार्यरत असलेल्या २ न्यायाधिशांना तसेच दि. १.१.२००६ ते आजतागायत कार्यरत असलेल्या सहकार न्यायाधिशांना द्यावयाच्या वेतन व भत्त्यामधील फरकाची रक्कम पृ. ३५/ प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये १,००,०२,३५०/- इतकी आहे.

तसेच मा. न्या. पद्‌मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार,सहकार न्यायाधिशांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

८. अतिथी भत्ता - कनिष्ठ स्तर- रु.१५००/-
९. वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-
१०. वैद्यकीय भत्ता - रु.१०००/-
११. पेपर भत्ता - रु. २५०/-
१२. पोषाख भता - रु. ६०००/- (३ वर्षातून एकदा)
१३. पेट्रोल - ७५ लिटर
१४. दूरध्वनी - दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स-
- कार्यालय- १५०० निवासस्थान-७५०

विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याचा निर्णय घेतला असून इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद स्वतंत्रपणे करण्याविषयी सूचना दिल्या आहेत. सहकार विभागाच्या अखत्यारीत सध्या २३ सहकारी न्यायालये कार्यरत असून त्यापैकी १६ ठिकाणी विभागाने सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिश कार्यरत असून उर्वरित ठिकाणी न्यायिक सेवेतील न्यायाधिशांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. सहकार विभागाच्या न्यायाधिशांना अद्याप न्या. शेट्टी तसेच न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्यात आलेल्या नाहीत. तत्कालिन सहकार न्यायाधिश श्री. मखरे यांनी न्या.शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक ९२३/२०११ दाखल केली आहे. सदर याचिकेच्या अनुषंगाने, मा. उच्च न्यायालयाच्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये असे कळविण्यात आले आहे की, " वेतन, भत्ते व परिलब्धी याबाबत सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांच्या पदांचे दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी प्रथम वर्ग या पदांशी समानीकरण करण्याची शिफारस मा. प्रशासकीय न्यायाधिशांच्या समितीने केली आहे. त्यानुसार सहकार न्यायाधिशांना संबंधित तारखांपासून मा. शेट्टी/पद्मनाभन आयोगच्या शिफारशी लागू करण्यात याव्या. "

उपरोक्त बाबी लक्षात घेऊन, मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव पृ.१-४/टि.वि. अन्वये विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभाग यांना सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावास अनुसरून विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय कृपया पृ. ५/टि.वि. वर पहावेत. सदर प्रकरणी, "उच्च न्यायालयाकडून याबाबत दि. १०.५.२०११ रोजी लिहिलेल्या पत्रानुसार स्पष्टपणे अभिप्राय कळविण्यात आलेले आहेत. त्यानुसार विभागामार्फत कारवाई अपेक्षित आहे." असे अभिप्राय विधी व न्याय विभागाने दिलेले आहेत.

उपरोक्त बाबी तसेच विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय लक्षात घेता, सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि. १.९.१९९८ पासून व न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी दि. १.१.२००६ पासून लागू करण्यास मंजूरी देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात येत आहे.

क.अ. (श्री. गां.)

उ.स. (श्रीम.पा.)

सचिव (सहकार)

प्र.स. (वित्त)

विषय - **सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबत**

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी. क्रमांक १०२२/१९८९ मध्ये दिलेल्या निदेशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती, श्री. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत सर्व राज्य शासनांना दिलेल्या निर्देशास अनुसरून विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१०, दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील कार्यरत तसेच सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतन व भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. तसेच इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद स्वतंत्रपणे करण्याबाबत नमूद केले आहे.

त्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई व खंडपीठातील सदस्यांना मा. न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिली असून त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही वेतन, भत्ते व वित्तलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली आहे तसेच न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे. सदर बाब तसेच वर नमूद केल्याप्रमाणे विधी व न्याय विभागाच्या दि. २२.१०.२०१० च्या शासन निर्णयातल तरतुदी विचारात घेता सहकार न्यायालयाच्या न्यायाधिशांना न्या. शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करणे आवश्यक आहे. सहकार न्यायालयावर १६ न्यायाधिश सहकार विभागाचे असून त्यांना ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे वेतन देण्यात येते. त्यानुसार सहकार न्यायालयातील १६ न्यायाधिशांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करावी लागेल. विधी व न्याय विभाग शासन निर्णय, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि. १.९.१९९८ पासून सहकार न्यायाधिश संवर्गाला शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करणे उचित होईल.

मा. उच्च न्यायालयाने सहकार न्यायाधिशांना, दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) यांची वेतनश्रेणी लागू केली असून न्या.शेट्टी आयोगानुसार सहकार न्यायाधिशांची वेतनश्रेणी - रु. ९०००-२५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० असून मा. न्या.पद्मनाभन समितीप्रमाणे वेतनश्रेणी-२७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० आहे.

शेट्टी आयोगाच्या शिफारशीनुसार, सहकार न्यायालयातील न्यायाधिशांचे वेतन कमी येत असल्याने दि.१.९.१९९८ ते ३१.१२.२००५ या कालावधीतील वेतनापोटीच्या रकमेत फरक येत नाही. तथापि भत्त्यापोटी द्यावयाच्या फरकाची पृ.३३/प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रक्कम रुपये १०,८०,९१८/- इतकी आहे.

तसेच दिनांक १.१.२००६ ते दि. ३१.५.२०११ पर्यंत कार्यरत असलेल्या सहकर न्यायाधिशांना मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार, दि. १.१.२००६ ते दि. ३१.१.२००८ या कालावधीत कार्यरत असलेल्या २ न्यायाधिशांना तसेच दि. १.१.२००६ ते आजतागायत असलेल्या सहकार न्यायाधिशांना द्यावयाच्या वेतन व भत्त्यामधील फरकाची रक्कम पृ. ३५/ प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये १,००,०२,३५०/- इतकी आहे.(१,८१,८०,४५०/-)

तसेच मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सहकार न्यायाधिशांना सुधारीत वेतनश्रेणीनुसार द्याव्या लागणाऱ्या वेतनापोटी वार्षिक रु. २३,००,०४०/- इतक्या रकमेची तरतुद करावी लागेल. सहकार न्यायाधिशांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

१५. अतिथी भत्ता - कनिष्ठ स्तर- रु.१५००/-
१६. वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-

| | | |
|---|---|---|
| १७.वैद्यकीय भत्ता | - | रु.१०००/- |
| १८.पेपर भत्ता | - | रु. २५०/- |
| १९. पोषाख भता | - | रु. ६०००/- (३ वर्षातून एकदा) |
| २०. पेट्रोल | - | ७५ लिटर |
| २१. दूरध्वनी | - | दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स- - कार्यालय- १५०० निवासस्थान-७५० |

दि. १.९.१९९८ ते दि. ३१.१२.२००५ या कालावधीत निवृत्त झालेल्या महाराष्ट्र राज्य सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार वेतनभत्त्याच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु. ३,९४,८०० आहे.तसेच कार्यालयीन खर्चाच्या भत्त्यापोटी द्यावयाची रक्कम रु.६,१६,५००/- इतकी असून एकूण रु.१०,११,३००/-

आहे. तसेच दि. १.९.१९९८ ते दि.३१.१२.२००५ या कालावधीत कार्यरत न्यायाधिशांना भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु.३,९३,६००/- इतकी असून कार्यालयीन खर्चाच्या भत्त्यापोटीच्या फरकाची रक्कम रु. १४,०९,०००/- असून एकूण रु. १८,०२,६००/- आहे. तसेच न्या. पद्मनाभन आयोगानुसार दि. १.१.२००६ ते १.५.२०११ या कालावधीत निवृत्त व कार्यरत न्यायाधिशांना वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाच्या रक्कम रु.१,५७,४७,३५०/- असून कार्यालयीन खर्चाच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु.११,२१,०००/- असून एकूण रु. १,६८,६८,३५०/- आहे.

उपरोक्त प्रमाणे सहकार न्यायाधिशांना मा. शेट्टी आयोग व मा. न्या. पदमनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक ३१.५.२०११ पर्यंत वेतन व भत्त्यापोटी द्यावयाची एकूण रक्कमरु. १,६८,२४,४५०/- इतक्या रकमेची तसेच न्यायाधिशांच्या कार्यालयीन खर्चासाठी रु. १३,५६,०००/- अशी एकूण रु.१,८१,८०,४५०/- इतक्या रकमेची तरतुद करणे आवश्यक आहे.

उपरोक्त बाबी लक्षात घेता, मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याची विनंती विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभाग यांना करण्यात येत आहे.

तत्कालिन सहकार न्यायाधिश श्री. मखरे यांनी न्या.शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक दाखल केली असून पुढील सुनावणी दि. १३.६.२०११ रोजी आहे. तरी याप्रकरणी प्राथम्य देण्याची विनंती आहे.

क.अ. (श्री. गां.)

उ.स. (श्रीम.पा.)

सचिव (सहकार)

प्र.स. (विधी व न्याय)

प्र.स. (वित्त)

पृष्ठ १-४/टि.वि. वरील टिप्पणीचे कृपया अवलोकन करावे.

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी. क्रमांक १०२२/१९८९ मध्ये दिलेल्या निदेशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती, श्री. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत सर्व राज्य शासनांना दिलेल्या निर्देशास अनुसरून विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१०, दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील कार्यरत तसेच सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतन व भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. तसेच इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद स्वतंत्रपणे करण्याबाबत नमूद केले आहे.

दिनांक ३१.१.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यानुसार सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय या पदाला मा. न्यायमूर्ती, श्री. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतनश्रेणी लागू करणे आवश्यक असून त्याबाबतचा आदेश निर्गमित करणे आवश्यक आहे.

न्या. शेट्टी आयोगानुसार सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय या पदाची वेतनश्रेणी रु. १६७५०-४००-१९१५०-४५०-२०५०० अशी असून न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सदर पदाची वेतनश्रेणी रु.५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० अशी सूधारीत करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे अधिपत्याखाली दि. १.९.१९९८ ते दि. ३१.१२.२००५ या कालावधीत पृ. /प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण ४ सदस्य कार्यरत होते मा. न्यायमूर्ती शेट्टी आयोगानुसार त्यांना वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाच्या रक्कम रु. १,६३,२००/- आहे.

द्यावयाच्या

विषय :- **सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांच्या वेतन निश्चितीबाबत . .**
न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करणे.

उपरोक्त विषयावरील पृ.१ ते ४/टि.वि. वरील टिप्पणीचे कृपया अवलोकन करावे.

सदर टिप्पणीद्वारे, सहकार अपील न्यायालयाच्या सदस्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव विधी व न्याय विभागास तसेच वित्त विभागाचे मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

उक्त विषयी सादर करण्यात आलेला प्रस्ताव खालीलप्रमाणे -

न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन निश्चिती करण्याबाबत श्री.जे.व्ही.व्यवहारे, सेवानिवृत्त सदस्य व श्रीमती एस.आर.पवार, सदस्या, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांचा दि.३०/१०/२०१० चा विनंती अर्ज; विधी व न्याय विभागाचा दि.२२/१०/२०१० चा शासन निर्णय; निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि.२५/१/२०११ चे पत्र आणि अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांचा दि.३/३/२०११ चा प्रस्ताव कृपया पहावा.

२. श्री. व्यवहारे यांनी त्यांच्या अर्जामध्ये असे नमूद केले आहे की, त्यांनी मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.३३८/२०१० मध्ये मा. न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार दि.१८/३/२०१० च्या शासन निर्णयान्वये मा. शेट्टी आयोगाच्या शिफारशी महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय सदस्यांना दि.१/१/२००६ पासून लागू करण्यात आल्या आहेत. सदर शिफारशी लागू करण्याच्या दिनांकामध्ये दुरुस्ती करण्यासंदर्भात त्यांनी शासनाकडे निवेदन सादर केले आहे.

३. दरम्यान मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.क्र. १०२२/८९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती पद्मनाभन यांच्या अध्यक्षतेखालील समितीने (दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग) जुलै, २००९ मध्ये अहवाल दिला असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर आयोगाच्या शिफारशी दुय्यम न्यायिक अधिका-यांना लागू करण्याचे निर्देश सर्व राज्य शासनांना दिले आहेत. त्यानुसार विधी व न्याय विभागाने दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या असून अन्य मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिका-यांसाठी होणा-या खर्चाची तरतूद स्वतंत्ररित्या करावी असे देखील शासन निर्णयामध्ये नमूद

केले आहे. त्यानुसार सहकार विभागाने देखील आदेश निर्गमित करणे आवश्यक आहे. सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय या पदाची न्या. शेट्टी आयोगानुसार निश्चित केलेली वेतनश्रेणी रु.१६७५०-४००-१९१५०-४५०-२०५०० अशी आहे. न्या.पद्मनाभन समितीनुसार सदर पदाची वेतनश्रेणी रु.५१५५०-१२३०-५८९३० -१३८०-६३०७० अशी सुधारीत करणे आवश्यक आहे. यापूर्वी मा.उच्च न्यायालयाने दि.५/२/२००८ च्या पत्रान्वये सहकार न्यायालये व सहकार अपील न्यायालये ही मा.उच्च न्यायालयाच्या नियंत्रण व पर्यवेक्षणाखाली असून त्यांचा समावेश दुय्यम न्यायिक सेवेमध्ये होत असल्याचे स्पष्ट केले आहे. श्री.व्यवहारे यांनी असेही नमूद केले आहे की, ते दि.२/४/२०१० पासून सेवानिवृत्त झाले असून त्यांना दि.१/२/०८ पासून सुधारीत वेतनश्रेणी देय आहे. तसेच श्रीमती पवार यांना सदस्य म्हणून नियुक्तीच्या दिनांकापासून सुधारित वेतनश्रेणी देय आहे. तरी सदस्य सहकार अपील न्यायालय यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याची विनंती श्री. व्यवहारे यांनी केली आहे.

४. प्रबंधक (तपासणी ), उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २५.१.२०११ च्या पत्रान्वये उच्च न्यायालयाच्या दिनांक ११.११.२०१० च्या अधिसूचनेची प्रत शासनास पाठविली असून पद्मनाभन समितीच्या शिफारशी सहकारी अपील न्यायालयाच्या सदस्यांना लागू करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती केली आहे.

५. श्री.व्यवहारे यांच्या निवेदनाच्या अनुषंगाने दि.२४/११/२०१० च्या शासन पत्रान्वये अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांचे अभिप्राय मागविण्यात आले. त्यानुसार दि.३/३/२०११ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. प्रस्तावात असे नमूद करण्यात आले आहे की, विधी व न्याय विभागाच्या दि.२२/१०/२०१० व ५/१/२०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील दुय्यम न्यायालयातील कार्यरत व निवृत्त न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे. सहकार अपील न्यायालयाच्या सदस्यांना मा. शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आल्या असल्याने त्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी सुध्दा लागू करणे आवश्यक असल्याचे मत अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय यांनी व्यक्त केले आहे.

६. सहकारी अपील न्यायालयातील कार्यरत सदस्यांच्या सदस्य पदावरील नियुक्तीचे दिनांक तसेच राज्य शासनाच्या सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याचा दिनांक विचारात घेऊन सदस्यांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१/१/२००६ पासून लागू करण्यात आल्या. तथापि, काही निवृत्त सदस्यांनी विधी व न्याय विभागाच्या दि. ४.७.२००३ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार दिनांक १.७.१९९६ पासून तर श्री. व्यवहारे यांनी दिनांक ४.७.२००३ पासून शिफारशी लागू करण्याची विनंती केली आहे. यासंदर्भात असे

नमूद करण्यात येते की, मा. उच्च न्यायालयाने शेट्टी आयोगाच्या शिफारशी न्यायिक अधिकाऱ्यांना लागू करण्याबाबत दिनांक २९.७.२००३ रोजी जारी केलेल्या अधिसूचनेमध्ये सहकारी न्यायालये/अपील न्यायालये यांच्याबाबत विशिष्ट उल्लेख नसल्याने सदर अधिसूचनेमध्ये योग्य ती सुधारणा करण्याची विनंती दिनांक २५.६.२०१० च्या पत्रान्वये मा. उच्च न्यायालयास करण्यात आली आहे.

७. प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही, वेतन भत्ते व वित्तलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली आहे तसेच न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे.

८. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि. १.९.१९९८ पासून सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना शेट्टी आयोगाच्या शिफारशी तसेच दिनांक १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करणे योग्य राहील.

९. न्या.पद्मनाभन समितीनुसार सदस्य पदाची वेतनश्रेणी रु.५१५५०-१२३०-५८९३० -१३८०-६३०७० असून सदस्यांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

अतिथी भत्ता- वरीष्ठ स्तर- रु.२३००/-

वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-

| | | |
|---|---|---|
| वैद्यकीय भत्ता | - | रु.१०००/- |
| पेपर भत्ता | - | रु. २५०/- |
| पोषाख भता | - | रु. ६०००/- (३ वर्षातून एकदा) |
| पेट्रोल | - | ७५ लिटर |
| दूरध्वनी | - | दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स- |
| | | कार्यालय- १५०० निवासस्थान-७५० |

९. महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे अधिपत्याखाली दि. १.९.१९९८ ते दि. ३१.१२.२००५ या कालावधीत कार्यरत असलेल्या सदस्यांना शेट्टी आयोगानुसार, वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम (रु. ९,७२,६७८ + रु. ६,१६,५००) रु.१५,८९,१७८/- आहे. तसेच न्या.

पद्मनाभन आयोगानुसार दि. १.१.२००६ ते १.५.२०११ या कालावधीत निवृत्त सदस्यांना वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाच्या रक्कम (रु.१३,२२,६०० + रु.१,३१,०००) रु.१४,५३,६००/- आहे तसेच कार्यरत सदस्यांना वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाच्या रक्कम (रु.१०,८९,२०० + रु. १,०४,०००/-) रु. ११,९३,२००/- आहे. याप्रमाणे एकूण रु.४२,३५,९७८/- /- इतक्या रकमेची तरतुद करणे आवश्यक आहे.

१०. श्री. व्यवहारे यांनी न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय मुंबईच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये रिट याचिका क्र.२२४/२०११ दाखल केली आहे. सदर रिट याचिकेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याबाबत आदेशित केले आहे.

११. सदर प्रकरणी विधी व न्याय विभागाने त्यांच्या पृ. ९/टि.वि. वरील टिप्पणीअन्वये मान्यता दिली असून, सहकार अपील न्यायालयाच्या सदस्यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास सत्वर मंजूरी देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात येत आहे.

**क.अ. (श्री.गां.)**

**उ.स.(श्रीम.पा.)**

**सचिव (सहकार)**

**प्र.स.(वित्त)**

सहकार अपील न्यायालयाच्या सदस्यांना दि.१/१/२००८ पासून सदर शिफारशी लागू करण्याच्या वेतन खर्चापोटी वार्षिक रु. ११,५०,९५६/- इतक्या तर वेतनाच्या थकबाकीपोटी रु.३०,००,७३८/- इतक्या रकमेची आवश्यकता आहे. तसेच सदस्यांना अनुज्ञेय असणारे भत्ते व इतर सुविधांपोटी वार्षिक रुपये ३,०३,६००/- तर थकबाकीपोटी रु.५,४९,९००/- इतका खर्च येईल. तसेच १६ सहकार न्यायाधीशांना पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करावयाची झाल्यास वेतन खर्चापोटी वार्षिक रु. ९५,१८,४००/- इतक्या तर वेतनाच्या थकबाकीपोटी रु.७३,१६,४००/- इतक्या रकमेची आवश्यकता आहे. तसेच न्यायाधीशांना अनुज्ञेय असणारे भत्ते व इतर सुविधांपोटी वार्षिक रुपये २८,४१,६००/- तर थकबाकीपोटी रु.१,०८,७९२००/- इतका खर्च येईल.

विषय - **सहकार न्यायालयातील न्यायाधिशांना न्या.शेट्टी आयोग व न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबत**

उपरोक्त विषयावरील पृ. १-४/टि.वि. वरील टिप्पणीचे कृपया अवलोकन करावे.

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी. क्रमांक १०२२/१९८९ मध्ये दिलेल्या निदेशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती, श्री. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबत सर्व राज्य शासनांना दिलेल्या निर्देशास अनुसरून विधी व न्याय विभागाने दि. २२.१०.२०१०, दि. ५.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायालयातील कार्यरत तसेच सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतन व भत्ते देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. तसेच इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद स्वतंत्रपणे करण्याबाबत नमूद केले आहे.

त्यानुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई व खंडपीठातील सदस्यांना मा. न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिली असून त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

प्रबंधक (तपासणी-१), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी शासनास पाठविलेल्या दि. १०.५.२०११ च्या पत्रान्वये सरळसेवेने नियुक्त सहकार न्यायाधिशांची पदे ही वेतन, भत्ते व वित्तलब्धीबाबत दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर व न्यायिक दंडाधिकारी, वर्ग-१ या पदाच्या समकक्ष करण्याची शिफारस केली आहे तसेच न्यायाधिश, सहकार न्यायालय यांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी त्या त्या तारखेपासून लागू करण्याबाबत सूचित केले आहे. सदर बाब तसेच वर नमूद केल्याप्रमाणे विधी व न्याय विभागाच्या दि. २२.१०.२०१० च्या शासन निर्णयातल तरतुदी विचारात घेता सहकार न्यायालयाच्या न्यायाधिशांना न्या. शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करणे आवश्यक आहे. सहकार न्यायालयावर १६ न्यायाधिश सहकार विभागाचे असून त्यांना ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे वेतन देण्यात येते. त्यानुसार सहकार न्यायालयातील १६ न्यायाधिशांना मा. न्या. शेट्टी आयोग व मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करावी लागेल. विधी व न्याय विभाग शासन निर्णय, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दि. १.९.१९९८ पासून सहकार न्यायाधिश संवर्गाला शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करणे उचित होईल.

मा. उच्च न्यायालयाने सहकार न्यायाधिशांना, दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) यांची वेतनश्रेणी लागू केली असून न्या.शेट्टी आयोगानुसार सहकार न्यायाधिशांची वेतनश्रेणी - रु. ९०००-२५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० असून मा. न्या.पद्मनाभन समितीप्रमाणे वेतनश्रेणी-२७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० आहे.

शेट्टी आयोगाच्या शिफारशीनुसार, सहकार न्यायालयातील न्यायाधिशांचे वेतन कमी येत असल्याने दि.१.९.१९९८ ते ३१.१२.२००५ या कालावधीतील वेतनापोटीच्या रकमेत फरक येत नाही. तथापि भत्त्यापोटी द्यावयाच्या फरकाची पृ.३३/प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रक्कम रुपये १०,८०,९१८/- इतकी आहे.

तसेच दिनांक १.१.२००६ ते दि. ३१.५.२०११ पर्यंत कार्यरत असलेल्या सहकर न्यायाधिशांना मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार, दि. १.१.२००६ ते दि. ३१.१.२००८ या कालावधीत कार्यरत असलेल्या २ न्यायाधिशांना तसेच दि. १.१.२००६ ते आजतागायत असलेल्या सहकार न्यायाधिशांना द्यावयाच्या वेतन व भत्त्यामधील फरकाची रक्कम पृ. ३५/ प.वि. येथे दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये १,००,०२,३५०/- इतकी आहे.(१,८१,८०,४५०/-)

तसेच मा. न्या. पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार सहकार न्यायाधिशांना सुधारीत वेतनश्रेणीनुसार द्याव्या लागणाऱ्या वेतनापोटी वार्षिक रु. २३,००,०४०/- इतक्या रकमेची तरतुद करावी लागेल. सहकार न्यायाधिशांना खालीलप्रमाणे मासिक भत्ते देय आहेत -

२२.अतिथी भत्ता - कनिष्ठ स्तर- रु.१५००/-
२३.वीज व पाणी ५० % जास्तीत जास्त रु. ७५०/-

| | | |
|---|---|---|
| २४. वैद्यकीय भत्ता | - | रु.१०००/- |
| २५.पेपर भत्ता | - | रु. २५०/- |
| २६.पोषाख भता | - | रु. ६०००/- (३ वर्षातून एकदा) |
| २७. पेट्रोल | - | ७५ लिटर |
| २८.दूरध्वनी | - | दोन महिन्यांसाठी असणारे विनामुल्य कॉल्स- - कार्यालय- १५०० निवासस्थान-७५० |

दि. १.९.१९९८ ते दि. ३१.१२.२००५ या कालावधीत निवृत्त झालेल्या महाराष्ट्र राज्य सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार वेतनभत्त्याच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु. ३,९४,८०० आहे.तसेच कार्यालयीन खर्चाच्या भत्त्यापोटी द्यावयाची रक्कम रु.६,१६,५००/- इतकी असून एकूण रु.१०,११,३००/-

आहे. तसेच दि. १.९.१९९८ ते दि.३१.१२.२००५ या कालावधीत कार्यरत न्यायाधिशांना भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु.३,९३,६००/- इतकी असून कार्यालयीन खर्चाच्या भत्त्यापोटीच्या फरकाची रक्कम रु. १४,०९,०००/- असून एकूण रु. १८,०२,६००/- आहे. तसेच न्या. पद्मनाभन आयोगानुसार दि. १.१.२००६ ते १.५.२०११ या कालावधीत निवृत्त व कार्यरत न्यायाधिशांना वेतन व भत्त्याच्या फरकापोटी द्यावयाच्या रक्कम रु.१,५७,४७,३५०/- असून कार्यालयीन खर्चाच्या फरकापोटी द्यावयाची रक्कम रु.११,२१,०००/- असून एकूण रु. १,६८,६८,३५०/- आहे.

उपरोक्त प्रमाणे सहकार न्यायाधिशांना मा. शेट्टी आयोग व मा. न्या. पदमनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक ३१.५.२०११ पर्यंत वेतन व भत्त्यापोटी द्यावयाची एकूण रक्कमरु. १,६८,२४,४५०/- इतक्या रकमेची तसेच न्यायाधिशांच्या कार्यालयीन खर्चासाठी रु. १३,५६,०००/- अशी एकूण रु.१,८१,८०,४५०/- इतक्या रकमेची तरतुद करणे आवश्यक आहे.

उपरोक्त बाबी लक्षात घेता, मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने सहकार न्यायालयांतील न्यायाधिशांना शेट्टी आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करणेस तसेच मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्याची विनंती विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभाग यांना करण्यात येत आहे.

तत्कालिन सहकार न्यायाधिश श्री. मखरे यांनी न्या.शेट्टी/पद्मनाभन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक दाखल केली असून पुढील सुनावणी दि. १३.६.२०११ रोजी आहे. तरी याप्रकरणी प्राथम्य देण्याची विनंती आहे.

क.अ. (श्री. गां.)

उ.स. (श्रीम.पा.)

सचिव (सहकार)

प्र.स. (विधी व न्याय)

प्र.स. (वित्त)

F:\padmanabhan.doc

मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव व उ.स.(श्रीम.पारकर) यांच्यात झालेल्या चर्चेस अनुसरून सादर.

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालयातील सदस्यांना, शासन निर्णय, दि.१८/३/२०१० अन्वये दि.१/१/२००६ पासून न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आल्या आहेत.

मा. सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.क्र. १०२२/८९ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार नेमलेल्या मा. न्यायमूर्ती पद्मनाभन यांच्या अध्यक्षतेखालील समितीने (दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग) जुलै, २००९ मध्ये अहवाल दिला असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर आयोगाच्या शिफारशी दुय्यम न्यायिक अधिका-यांना लागू करण्याचे निर्देश सर्व राज्य शासनांना दिले आहेत. त्यानुसार विधी व न्याय विभागाने दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये दुय्यम न्यायिक अधिका-यांना न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्या असून अन्य मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिका-यांसाठी होणा-या खर्चाची तरतूद स्वतंत्ररित्या करावी असे शासन निर्णयामध्ये नमूद केले आहे.

श्री. जे.व्ही.व्यवहारे, सेवानिवृत्त, सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय यांनी न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.२२४/२०११ दाखल केली आहे. सदर रिट याचिकेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याबाबत आदेशित केले आहे. तसेच, प्रबंधक (तपासणी-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांनी दि.२५.१.२०११ च्या पत्रान्वये, मा.उच्च न्यायालयाच्या दि.११.११.२०१० च्या अधिसूचनेनुसार, न्या पद्मनाभन समितीच्या शिफारशी महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना लागू करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्याविषयी विनंती केली आहे.

सदर बाबी विचारात घेऊन तसेच, शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, दि. ४.७.२००३ नुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि. १.७.१९९६ पासून शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचे निदेश देण्यात आले आहेत. दिनांक ३१.८.१९९८ च्या अधिसूचनेनुसार सहकार न्यायालये व अपिल न्यायालये मा. उच्च न्यायालयाच्या अधिपत्याखाली आली आहेत. त्यामुळे दिनांक १८.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१.१.२००६ पासून लागू करण्यात आल्या होत्या. तथापि, न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीही

दि.१.१.२००६ पासून लागू करावयाच्या असल्याने दि. १.९.१९९८ पासून सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना शेट्टी आयोगाच्या शिफारशी तसेच दिनांक १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशी लागू करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव ( नस्ती क्रमांक-राजस-१५१०/प्र.क्र.४४६/५-स अन्वये ) विधी व न्याय विभाग तसेच वित्त विभागास सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मान्यता दिली असून, वित्त विभागाने, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दिनांक १/९/१९९८ पासून न्या. शेट्टी आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतच्या प्रस्तावावर भाष्य करता येत नसल्याचे नमूद केले असून, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.

वित्त विभागाने, न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी दि.१.९.१९९८ पासून लागू करण्यासंदर्भात दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने याबाबत स्वतंत्र नस्तीद्वारे कार्यवाही करण्यात यावी. तत्पूर्वी, या विषयावर मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. २२४/२०११ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याचे आदेश दिले आहेत. त्यामुळे सदर प्रकरणी दि. २६.८.२०११ पूर्वी निर्णय घेण्याची आवश्यकता असल्याने वित्त विभागाने मान्यता दिल्याप्रमाणे, सहकार अपिल न्यायालयाच्या सदस्यांना दि. १.१.२००६ पासून न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्यास मान्यता देण्याबाबतची कार्यवाही प्रथमतः करण्याच्या अनुषंगाने सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी दि. १८/८/२०११ रोजी सादर करण्यात आला आहे.

उपरोक्त प्रकरणी खाजगी सचिव, मा.मंत्री (सहकार) व उ.स.(श्रीम.पारकर) यांच्यात झालेल्या चर्चे-नुसार मा.मंत्री (सहकार) यांचा नुकताच अपघात झाल्यामुळे उक्तस्थितीत मा.मंत्री महोदयांना स्वाक्षरी करता येत नसल्यामुळे सदर प्रकरणी एक महिन्याची मुदत वाढवून देण्याबाबत सहायक शासकीय अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांना विनंती करण्याचे निर्देश दिले आहेत. त्याअनुषंगाने सहायक शासकीय अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांना कळवावयाच्या पत्राचे प्रारूप पृ. /प.वि वर मान्यतेस्तव सादर केले आहे. मान्य झाल्यास सदर पत्र निर्गमित करण्यात येईल.

क.अ.(श्री.गां.)

उ.स.(श्रीम.पा.)

सचिव (सहकार)

**महाराष्ट्र शासन**

क्र.राजस १७११/प्र.क्र.४९/५ स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ऑगस्ट, २०११.

प्रति,

सहायक शासकीय अभियोक्ता,
मा. उच्च न्यायालय, मुंबई
खंडपीठ औरंगाबाद

विषय :-रिट पिटीशन क्र. २२४/२०११
**श्री. जगन्नाथ विश्वनाथ व्यवहारे**
**विरुध्द**
**महाराष्ट्र शासन**

संदर्भ:- सहायक निबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांचे पत्र क्र. डीडी/ डब्ल्यूपी/ नं.१३५५८/२०११, दि.७/५/२०११.

महोदय,

श्री. जे.व्ही.व्यवहारे, सेवानिवृत्त, सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय यांनी न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.२२४/२०११ दाखल केली आहे. सदर रिट याचिकेच्या सुनावणीअंती मा. उच्च न्यायालयाने दि. २७.४.२०११ रोजी सदर प्रकरणी चार महिन्यांच्या आत निर्णय घेण्याचे आदेश दिले आहेत.

याबाबत असे नमूद करण्यात येते की, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालयाच्या सदस्यांना न्या. पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते लागू करण्याविषयक प्रस्तावास विधी व न्याय विभाग आणि वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली आहे. सदर प्रस्ताव दि.१८/८/२०११ रोजी शासनाच्या (मा.मंत्री (सहकार)) आदेशार्थ सादर करण्यात आला आहे. तथापि, मा.मंत्री (सहकार) यांचा नुकताच अपघात होऊन उजव्या हाताला दुखापत झाल्याने त्यांना स्वाक्षरी करण्यात अडचण येत आहे. त्यामुळे सदर प्रकरणी निर्णय घेण्यास एक महिन्याची मुदत वाढवून देण्याबाबत कृपया शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालयास विनंती करण्यात यावी.

आपला

(सु.गं.गांगरकर)
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग